**कार्य आयोजना यंत्रणेचे बळकटीकरण या योजनेत्तर योजनेतील ८० अस्थायी पदांना सन २०१८-२०१९ मध्ये मुदतवाढ देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**महसूल व वन विभाग,**

**शासन निर्णय क्रमांक :- टिआरएस-०३/२०१८/प्र.क.८४/फ-६**

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,

दिनांक :- ०१ ऑक्टोबर, २०१८

**वाचा:-**

१. शासन निर्णय,वित्त विभाग, क्र.पदनि २०१६/प्र.क्र.०८/१६/आ.पु.क., दिनांक ५.३.२०१८
२. शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्र. एफडीएम-२०१७/प्र.क्र.३४/फ-२, दि.१८.१.२०१८
३. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास),म.रा.नागपूर यांचे पत्र क्र.कक्ष-३/योजनेत्तर/प्र.क्र.१३/१७-१८/२१६९,दि.२२.०२.२०१८
४. शासन निर्णय महसूल व वन विभाग क्र. टिआरएस-०३/२०१७/प्र.क्र.८४/फ-६ दिनांक १४.३.२०१८.
५. शासन निर्णय वित्त विभाग क्र. पदनि २०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दिनांक ७.०९.२०१८
६. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्र.कक्ष ३/यो/प्र.क्र.०१/११०१/१८-१९ , दिनांक २४.०९.२०१८.

**शासन निर्णय :-**

"कार्य आयोजना यंत्रणेचे बळकटीकरण" या योजनेत्तर योजनेतील सोबतच्या विवरणपत्रातील ८० पदांना सन २०१७-१८ मध्ये शासन निर्णय संदर्भ क्र.४ अन्वये दिनांक १.३.२०१८ ते दिनांक ३०.०९.२०१८ पर्यन्त मुदतवाढ देण्यात आली होती. सदर पदांची मुदत दिनांक ३०.०९.२०१८ रोजी संपुष्टात आली आहे. त्यानुसार आकृतीबंधातील २५०२५ पदांमध्ये या योजनेतर ८० पदांचा समावेश असल्याने सोबतच्या विवरणपत्रात दर्शविलेल्या ८० पदांना संदर्भ क्र. ६ येथील पत्रान्वये प्राप्त प्रस्तावाच्या अनुषंगाने सन २०१८-१९ मध्ये दिनांक १.१०.२०१८ ते दिनांक २८.०२.२०१९ पर्यंत मुदतवाढ देण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

२. याबाबत होणारा खर्च हा “मागणी क्रमांक सी-७, प्रधानशीर्ष २४०६- वनीकरण व वन्यजीवन (योजनेत्तर) ०१ वनीकरण, १०१ वनसंधारण, विकास व पुनर्निर्मिती (०४) (०१) कार्य आयोजनेची सुधारणा व तयारी (२४०६ ०१४९) ०१ वेतन” हया लेखाशीर्षाखाली दर्शविण्यात यावा व सन २०१८-१९ या आर्थिक वर्षामध्ये मंजूर होणाऱ्या अनुदानातून भागविण्यात यावा. या कालावधीमध्ये मंजूर पदांचा आढावा घेऊन, सुधारित आकृतीबंधास उच्चस्तरीय सचिव समितीची मान्यता घेणे आवश्यक आहे.

३. प्रस्तुत शासन निर्णय हा वित्त विभागाच्या शासन निर्णय,वित्त विभाग, क्र.पदनि २०१६/ प्र.क्र.०८/१६/आ.पु.क., दिनांक ०७.०९.२०१८ अन्वये विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८१००११३१२३३७०१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Sujay Dodal

Digitally signed by Sujay Dodal
DN: CN = Sujay Dodal, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Revenue and Forest Department
Date: 2018.10.01 13:23:38 +05'30'

**( सुजय दोडल )**
सह सचिव (वने)
महसूल व वन विभाग

सोबत :- विवरणपत्र

**प्रति :-**

१) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
२) प्रधान मुख्य वनसंरक्षक (उत्पादन व व्यवस्थापन), महाराष्ट्र राज्य, नागपूर
३) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
४) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक, कार्य आयोजना वृत्त, नागपूर /पुणे
५) सर्व मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक)
६) विभागीय वन अधिकारी, कार्य आयोजना, नागपूर/ चंद्रपूर/पुणे/ डहाणू/ औरंगाबाद
७) महालेखापाल-१ / २, (लेखा व अनुज्ञेयता)/ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर
८) वित्त विभाग, व्यय १०, अर्थसं-४, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
९) वन विभागातील सर्व कार्यासने/ ब-१, महसूल व वन विभाग, मंत्रालय,मुंबई- ३२.
१०) जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर/पुणे.
११) निवड नस्ती फ-६ कार्यासन, महसूल व वन विभाग.मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

**शासन निर्णय क्रमांक :- टिआएस- ०३/२०१८/प्र.क.८४/फ-६,**

**दिनांक ०१ .१०.२०१८ सोबतचे विवरणपत्र**

| पदनाम | पदसंख्या |
|---|---|
| मुख्य वनसंरक्षक | १ |
| उप वनसंरक्षक | ३ |
| कार्यालय अधिक्षक | १ |
| वनक्षेत्रसर्व्हेक्षक | १ |
| वनसर्व्हेक्षक | २ |
| वनरक्षक | २७ |
| मुख्य लेखापाल | १ |
| लेखापाल | ८ |
| लिपिक नि टंकलेखक | १३ |
| लघुलेखक (उच्च श्रेणी) | १ |
| लघुटंकलेखक | ३ |
| नाईक | १ |
| चौकीदार/रखवालदार | ३ |
| शिपाई | १५ |
| **एकूण** | ८० |

Sujay Dodal

Digitally signed by Sujay Dodal
DN: CN = Sujay Dodal, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Revenue and Forest Department
Date: 2018.10.01 13:23:58 +05'30'

**(सुजय दोडल)**
सह सचिव (वने)
महसूल व वन विभाग